**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक :- विजाभज-२०१४/ प्र.क्र१११/ विजाभज-१,**

मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरुचौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

तारीख: - १६ ऑगस्ट २०१४

वाचा —

**१. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज २०१४ /प्र.क्र.११०/ अर्थ-३,**

**दि.१ जुलै,२०१४.**

**२. संचालक, विजाभज पुणे यांचे पत्र क्रमांक.विजाभजसं/तांडा/ उपयोगिता**

**प्रमाणपत्र २०१४-१५/८११ दि.११ जुलै,२०१४**

**ज्ञापन:** -संदर्भाधीन परिपत्रकान्वये वित्त विभागाने सर्व मंत्रालयीन विभागांना महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ च्या अनुषंगाने वित्तीय वर्ष २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीच्या विनियोगाबाबत सूचना दिलेल्या आहेत.

२. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात मागणी क्र.एन.३,मुख्य लखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (०१) (०५) वि.जा.भ.वि.मा.प्र. यांच्या करिता तांडा वस्ती सुधार योजना (२२२५ ३३२२) या लेखाशिर्षाखालील एकूण रु.२१.०० कोटी अर्थसंकल्पीत तरतूदी पैकी ६० % रु.१२.६० कोटी (रुपये बारा कोटी साठ लाख फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास नियोजन विभाग व वित्त विभागाने मंजूरी दिली आहे.

२. वरील मंजूरीनुसार उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थीक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या रुपये २१.०० कोटी इतक्या तरतुदीपैकी ६० % इतका निधी म्हणजेच रु.१२.६० कोटी (अक्षरी रुपये बारा कोटी साठ लाख फक्त) इतका निधी तांडा वस्ती योजनेकरिता खालील अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन या ज्ञापनान्वये मंजूरी देत आहे.

१) वरील निधी खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियम, अधिकार, शासन निर्णय, परिपत्रक, केंद्रीय दक्षता अयोगांची मार्गदर्शक तत्वे व महालेखापाल कार्यलयाने उपस्थित केलेले मुद्दे याबाबतच्या सर्व अटी व पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

२) निधी अखर्चीत असल्यास त्याचे ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन सदर निधी जर खर्च करावयाचा नसल्यास शासनाच्या लेख्यामध्ये परत करण्यात यावा.

३) निधी वितरीत करताना मासकि निधी विविरण पत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

३. संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागसवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, पुणे यांनी वरील निधी हा लमाण/ बंजारा समाजाचे तांडे व भटक्या जमातीच्या वस्तीसाठी त्या त्या जिल्ह्यातील त्या त्या प्रवर्गातील लोकसंख्या व मागणीच्या प्रमाणात त्या त्या जिल्हयांना वाटप करण्यात यावे.

४. हे ज्ञापन नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.६३७/व्यय-१४, दि.१६.०८.२०१४ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१६१७४३४७२५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Pandurang Wadte

Digitally signed by Kiran Pandurang Wadte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kiran Pandurang Wadte
Date: 2014.08.16 17:41:22 +05'30'

(कि.पां.वडते)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक,विमुक्त जाती,भटक्या जमाती,इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग

२. कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे

३. आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे

४. सर्व जिल्हाधिकारी

५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद

६. सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण विभाग,

७. सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण विभाग,

८. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

९. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर

१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

११.नियोजन विभाग (कार्या-१४-१३), मंत्रालय मुंबई

१२.वित्त विभाग (कार्या-व्यय -१४) मंत्रालय मुंबई

१३.कक्ष अधिकारी, (कार्या. अर्थसंकल्प) सा.न्या. व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय मुंबई

१४.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई

१५.लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा मुंबई

१६.मा.मंत्री यांचे खाजगी सचिव

१७.मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

१८. सचिव,सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक

१९. निवडनस्ती,विजाभज-१